नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दि.२६.०८.२०१६ रोजी पारीत केलेला ठराव क्र.११९८ व दि.१५.०२.२०१७ रोजीचा ठराव क्र.१२७४ मधील उप सूचना अंशत: निलंबित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- नमुंम-१२१७/प्र.क्र.२२९/१७/नवि-२८**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**

४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ३० जून, २०१८

**संदर्भ:-** १) नवी मुंबई महानगरपालिका यांचा ठराव क्र.११९८, दि.१४.०९.२०१६ व ठराव क्र.१२७४, दि.१५.०२.२०१७.

२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/क्रिडा व सांस्कृ/६९४/२०१७, दि.०२.११.२०१७.

३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/क्रिडा व सांस्कृ/०३६/२०१८, दि.०९.०१.२०१८.

**प्रस्तावना:-**

नवी मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रातील उदयोन्मुख व होतकरु खेळाडूंना अधिकाधिक प्रोत्साहन मिळावे, याकरिता आर्थिक मदतीचा हात महापालिकेकडून देण्याकरिता शासनाच्या शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या धर्तीवर सुधारित क्रिडा शिष्यवृत्ती लागू करण्यास, तसेच यापुढे दर तीन वर्षांनी २५ टक्क्यांनी क्रिडा शिष्यवृत्ती रकमेत वाढ करण्याचे अनुषंगाने प्रस्ताव नवी मुंबई महानगरपालिकेच्या महासभेपुढे सादर केला असता, ठराव क्र.११९८, दि.२६.०८.२०१६ पुढील उपसूचनेसह मंजूर केलेला आहे:-

"अट क्र.१७ मध्ये खेळाडूंची कामगिरी उपरोक्त निकषावर तपासून शिष्यवृत्ती मंजूर अथवा नामंजूर करण्याचे अधिकार मा.आयुक्त यांना असतील या ऐवजी मा.सभापती, क्रिडा व सांस्कृतिक कार्यक्रम समिती यांना असतील."

२. त्याचप्रमाणे करार/कंत्राटावर निवडण्यात आलेले खेळाडू, मुख्य क्रिडा मार्गदर्शक व सहाय्यक क्रिडा मार्गदर्शकांचे वार्षिक प्रगतीचा आढावा घेऊन करार वाढविण्याबाबत नवी मुंबई महानगरपालिकेच्या महासभेपुढे प्रस्ताव सादर केला असता, दि.१५.०२.२०१७ रोजी महासभेने ठराव क्र.१२७४ पुढील उपसूचनेसह मंजूर केलेला आहे:-

"बाब क्र.११ मध्ये नमूद केल्यानुसार मा.आयुक्त या ऐवजी क्रिडा समितीस सर्व अधिकार असतील."

३. उत्कृष्ट खेळाडूंच्या निवड समितीत आयुक्तांच्यासह क्रिडा समिती सभापतींचाही समावेश आहे. त्याचप्रमाणे खेळाडूंची कामगिरी तपासून त्यांना शिष्यवृत्ती मंजूर/नामंजूर करण्याची तसेच खेळाडू, क्रिडा मार्गदर्शक, सहाय्यक क्रिडा मार्गदर्शक व मैदान मदतनीस यांचा करार वाढविण्याची कार्यवाही आयुक्तांमार्फतच गुणवत्तेवर व नि:पक्षपणे होऊ शकते व आर्थिक गैरव्यवहारास आळा बसू शकतो.

४. या बाबी विचारात घेता, नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दि.२६.०८.२०१६ रोजी पारीत केलेला ठराव क्र.११९८ व दि.१५.०२.२०१७ रोजीचा ठराव क्र.१२७४ मधील उपरोक्त नमूद उपसूचना निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दि.२६.०८.२०१६ रोजी मंजूर केलेला ठराव क्र.११९८ मधील अट क्र.१७ मध्ये खेळाडूंची कामगिरी उपरोक्त निकषावर तपासून शिष्यवृत्ती मंजूर अथवा नामंजूर करण्याचे अधिकार "मा.आयुक्त यांना असतील या ऐवजी मा.सभापती क्रिडा व सांस्कृतिक कार्यक्रम समिती यांना असतील" ही उपसूचना, त्याचप्रमाणे नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दि.१५.०२.२०१७ रोजी मंजूर केलेल्या ठराव क्र.१२७४ मधील बाब क्र.११ मध्ये नमूद केलेली "मा.आयुक्त या ऐवजी क्रिडा समितीस सर्व अधिकार असतील" ही उपसूचना महानगरपालिकेच्या व्यापक लोकहिताच्या विरुद्ध असल्याचे दिसून येत असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (१) मधील तरतुदीनुसार शासनास असलेल्या अधिकारान्वये अंतिमत: विखंडीत करण्यापूर्वी प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

२. याबाबत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (२) नुसार संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत शासनास सादर करावे. विहित मुदतीत अभिवेदन प्राप्त न झाल्यास अधिनियमातील कलम-४५१ (३) नुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१८०७०२१४५८२५०४२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2018.07.02 14:59:43 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
४) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती ( नवि-२८ ).